**मुंबई शहर महिला सुरक्षितता पुढाकार योजना (निर्भया) या योजनेच्या अंमलबजावणी करिता रु.३१.८७ कोटी इतका निधी वितरित व खर्च करण्यास मंजूरी देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: पीएडब्ल्यू-१११७/प्र.क्र.७१९ (भाग-४)/विशा-६**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक:- २७ जानेवारी, २०२२.

<u>वाचा:-</u>
१) गृह विभाग, शासन निर्णय क्र. पीएडब्ल्यू-१११७/प्र.क्र.७१९ (भाग-४)/विशा-६, दिनांक १४.०५.२०२१.
२) पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांचे दिनांक १६.०९.२०२१ रोजीचे पत्र.
३) गृह विभाग, शासन निर्णय क्र. पीएडब्ल्यू-१११७/प्र.क्र.७१९ /विशा-६, दिनांक ३१.०१.२०१९.

**<u>प्रस्तावना:-</u>**

मुंबई शहर महिला सुरक्षितता पुढाकार योजना या केंद्र आणि राज्य शासन पुरस्कृत योजनेच्या अंमलबजावणीस दिनांक ३१.०१.२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. सदर योजनेस केंद्र शासनाने रु. २५२ कोटी इतक्या निधीस मान्यता दिलेली असून या योजनेच्या निधीमध्ये केंद्र शासन व राज्य शासनाचा हिस्सा अनुक्रमे ६०:४० असा आहे. सदर योजने अंतर्गत रु. १४७.४८ कोटी च्या यंत्रसामग्री/साधनसामग्री खरेदीकरिता दिनांक १४.०५.२०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. सदर प्रशासकीय मान्यतेस अनुसरून पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांनी त्यांच्या दिनांक १६.०९.२०२१ रोजीच्या पत्रान्वये एकूण ४ प्रकारच्या यंत्रसामग्री / साधनसामग्री खरेदी करण्याकरिता रुपये ३२.९४ कोटी इतका निधी वितरित आणि खर्च करण्यास मान्यता देण्याबाबत शासनास प्रस्ताव सादर केला आहे.

पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांच्या प्रस्तावातील Forensic Evidence Collection system ही बाब मुंबई शहर - महिला सुरक्षितता पुढाकार योजनेअंतर्गत समाविष्ट करणेबाबत दिनांक ०३.०९.२०२१ रोजीच्या पत्रान्वये गृह मंत्रालय, भारत सरकार यांना विनंती करण्यात आली आहे. सदरील Forensic Evidence Collection system या बाबीस गृह मंत्रालय, भारत सरकार यांची मान्यता अद्याप अप्राप्त आहे. त्यामुळे, Forensic Evidence Collection system ही बाब वगळता उर्वरित ३ प्रकारच्या यंत्रसामग्री / साधनसामग्री खरेदी करण्याकरिता रुपये ३१.८७ कोटी इतका निधी वितरित आणि खर्च करण्यास मान्यता देण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन आहे.

**<u>शासन निर्णय</u> :-**

मुंबई शहर महिला सुरक्षितता पुढाकार योजना - निर्भया योजने अंतर्गत यंत्रसामग्री / साधनसामग्री खरेदीसाठी रु. ३१.८७ कोटी (रुपये एकतीस कोटी सत्त्याएशी लाख) इतका निधी वितरित व खर्च करण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

| अ. क्र. | खरेदीची बाब | लेखाशिर्ष ४०५५०२८८, निर्भया निधी अंतर्गत केंद्र हिस्सा (६०%) (रक्कम रु. कोटी) | लेखाशिर्ष ४०५५०२९७, राज्य हिस्सा (४०%) (रक्कम रु. कोटी) | एकूण रक्कम (रु. कोटी) |
|---|---|---|---|---|
| १. | पब्लिक अड्रेस सिस्टईम (P A System) | २.०५२ | १.३६८ | ३.४२ |
| २. | इमर्जन्सी रिस्पान्स व्हेईकल्स (Emergency Response Vehicle System) | १६.०१४ | १०.६७६ | २६.६९० |
| ३. | आय टी उपकरणे (IT Equipment) | १.०५६ | ०.७०४ | १.७६ |
| | **एकूण** | **१९.१२२** | **१२.७४८** | **३१.८७** |

२. सदर प्रयोजनासाठी या लेखाशीर्षांतर्गत प्राप्त होणारा निधी खर्च करण्यासाठी अपर पोलीस आयुक्त (गुन्हे), बृहन्मुंबई यांना नियंत्रण अधिकारी व वरिष्ठ प्रशासकीय अधिकारी, गुन्हे कोष, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. मुंबई शहर महिला सुरक्षितता पुढाकार योजना - निर्भया योजनेच्या अंमलबजावणी बाबत गृह मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली यांनी वेळोवेळी दिलेल्या मार्गदर्शक सूचनांचे तसेच, यंत्रसामग्री / साधनसामग्री खरेदी करण्याबाबत उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचनांचे पालन करावे.

४. केंद्र शासनाच्या गृह विभागामार्फत वितरीत करण्यात आलेला निधीचा विनियोग / खर्च हा केंद्र / राज्य शासनाच्या प्रचलित नियमानुसार विहीत पध्दतीने येणा-या किमतीनुसार व लेखाशिर्षनिहाय विहीत करण्यात आलेल्या एकूण वित्तीय मर्यादेच्या अधीन राहून व यासंदर्भातील वित्तीय औपचारीकता पूर्ण करून करण्यात यावी.

५. कोणत्याही परिस्थितीत प्राप्त निधी संचित (parking) स्वरूपात ठेऊ नये. यानुषंगाने प्राप्त निधीचा विनियोग झाल्यानंतर विहीत कालावधीत योग्य त्या विवरणपत्रात उपयोगिता प्रमाणपत्र (utilization certificate) सादर करावे. प्रस्तुत योजनेचे प्राधिकारी म्हणून केंद्रशासनाच्या आवश्यकतेनुसार अंतर्गत लेखापरीक्षणासाठी यासंदर्भातील लेखे अद्ययावत ठेवण्यात यावे.

६. सदर खर्च हा, गृह विभाग, मागणी क्र. बी-१०, ४०५५-पोलीसांवरील भांडवली खर्च, ००, २०७ राज्य पोलीस (दत्तमत), (००) (१३) ४०५५०२८८ निर्भया निधी अंतर्गत केंद्र हिस्सा (६०%) अंतर्गत आणि मागणी क्र. बी-१०, ४०५५-पोलीसांवरील भांडवली खर्च, ००, २०७ राज्य पोलीस (दत्तमत), (००) (१४) ४०५५०२९७ राज्य हिस्सा (४०%) लेखाशीर्षाखाली सन २०२१-२२ या चालू आर्थिक वर्षात उपलब्ध असलेल्या तरतूदींतून करण्यात यावा.

७. सदरहू शासन निर्णय हा वित्त विभागाने शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक २४ जून, २०२१, दिनांक २९ जुलै, २०२१ आणि दिनांक १४ आक्टोबर, २०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये दिलेल्या निदेशांस अनुसरून आणि वित्त विभागाने अनौपचारीक संदर्भ क्र. ८०५/ २०२१/ व्यय-७, दिनांक ०४.०१.२०२२ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय हा महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करून देण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०१२७१५२६१७३२२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by Rahul Vijay Kulkarni
Date: 2022.01.27 15:29:33 +05'30'

**( राहुल वि. कुलकर्णी )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मंत्री (गृह) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा. राज्यमंत्री, गृह (शहरे/ग्रामिण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. अपर मुख्य सचिव (गृह), यांचे स्वीय सहायक, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५. पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.
६. प्रधान सचिव (विशेष), यांचे स्वीय सहायक, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. मा. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर.
८. अपर पोलीस आयुक्त (गुन्हे), बृहन्मुंबई.
९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१०. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
११. व्यय-७, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. अर्थसंकल्प शाखा (बीयूडी-१), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. निवड नस्ती (विशा-६).